**दिनांक १ जानेवारी ते १५ जानेवारी या कालावधीत "मराठी भाषा संवर्धन पंधरवडा " साजरा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**मराठी भाषा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मभापं-२०१५/प्र.क्र.७०/भाषा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: २२ जुलै, २०१५

वाचा :-

१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.मभावा-१०९६/११६/प्र.क्र.७/९६/२०-ब,
२) मराठी भाषा विभाग शासन निर्णय क्र.मभादि-२०१२/१८३/प्र.क्र.६१/भाषा-२, दि.१२.४.२०१३
३) मराठी भाषा विभाग शासन परिपत्रक क्र.मभादि-२०१४/प्र.क्र.२८/भाषा-२, दि.१७.४.२०१४
४) मराठी भाषा विभाग शासन परिपत्रक क्र.मभापं-२०१५/प्र.क्र.६१/भाषा-२, दि.२.५.२०१५

प्रस्तावना :-

दिनांक १ मे ते १५ मे हा कालावधी “मराठी भाषा संवर्धन पंधरवडा” म्हणून साजरा करण्याचा निर्णय संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये घेण्यात आला होता. सन २०१३ पासून दरवर्षी “मराठी भाषा संवर्धन पंधरवडा” साजरा करण्यात येतो. “भाषा संवर्धन पंधरवडा” साजरा करताना वाचन संस्कृती, व्याख्याने, ग्रंथप्रदर्शन, लोककला इत्यादींचा समावेश असल्याने, यामध्ये शाळा व महाविद्यालये यांचा सहभाग आवश्यक आहे. भाषा संवर्धन उपक्रमांमध्ये शासकीय कार्यालयांबरोबरच शैक्षणिक संस्थांचा सहभाग वाढविण्यासाठी सद्याचा दिनांक १ मे ते १५ मे या पंधरवडयाच्या कालावधीत बदल करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

मराठी भाषेचे वैभव जपण्यासाठी, तिचे संवर्धन व भरभराट होण्यासाठी प्रतिवर्षी दिनांक १ जानेवारी ते १५ जानेवारी हा कालावधी “मराठी भाषा संवर्धन पंधरवडा” म्हणून साजरा करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. "मराठी भाषा संवर्धन पंधरवडा" साजरा करण्याबाबत खालील विविध कार्यक्रम आयोजित करून पंधरवडा साजरा करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

**अ) महाराष्ट्रातील अमराठी भाषिकांमध्ये मराठीचा प्रसार आणि प्रचार होऊन ही भाषा त्यांच्या मुखी आणि लेखी रुळावी यासाठी तज्ज्ञ मंडळीकडून कार्यशाळा / शिबीर आयोजित करण्यात यावे. त्यांचेसाठी वक्तृत्व, लेखन स्पर्धांचे आयोजन करावे.**

**आ) शासन व्यवहारात मराठीचा वापर या विषयावर मराठीतील टिप्पणी व प्रारुप लेखन या विषयावर परिसंवाद, कार्यशाळा यांचे आयोजन, तसेच राज्यस्तरीय वक्तृत्व, निबंधस्पर्धा यांचे आयोजन करावे, तसेच या कामी सेवानिवृत्त अनुभवी तज्ञांचे मार्गदर्शन घेण्यात यावे.**

**इ) मराठी वाचन संस्कृती वाढविण्यासाठी मराठीतील अभिजात ग्रंथांचा परिचय करून देणारी तज्ज्ञ व्यक्तींची व्याख्याने, ग्रंथप्रदर्शन, विविध प्रकारचे कोश वांड.मय, माहितीपट, मराठी चित्रपट, इतिहास यांचा परिचय करून देणारी ग्रंथप्रदर्शने यांचे आयोजन करावे.**

**ई) लोककला, लोकसंगीत-भारूड, गवळण, कथाकथन, काव्यवाचन या विषयी कार्यक्रम, स्पर्धा यांचे आयोजन करावे. यासाठी या क्षेत्रातील तज्ज्ञ व्यक्तींचे मार्गदर्शन/सहकार्य घेण्यात यावे.**

**उ) भाषा संचालनालयाने प्रकाशित केलेल्या परिभाषा कोशासंबंधी तीन दिवशीय कार्यशाळा आयोजित करावी यासाठी भाषा तज्ज्ञांचे मार्गदर्शन घ्यावे.**

राज्यात तसेच जिल्हा स्तरावर त्यांच्या अधिपत्याखाली असलेल्या कार्यक्षेत्रात सदर पंधरवडा खालीलप्रमाणे साजरा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

अ) मुंबई (मुख्यालय स्तरावर) - सर्व मंत्रालयीन विभाग, त्यांच्या अधिपत्याखालील मुंबईतील कार्यालये

ब) सर्व अनुदानित/खाजगी शाळा, महाविद्यालये व विद्यापीठे

क) सर्व विभागीय आयुक्त यांचे कार्यालय

ड) सर्व जिल्हाधिकारी- विभागाच्या अधिपत्याखालील जिल्हास्तरीय कार्यालये

इ) मुख्य कार्यकारी अधिकारी (जिल्हा परिषदा) - तालुकास्तरावर, ग्रामिणस्तरावर

ई) राज्यातील केंद्र शासनाच्या अधिपत्याखालील कार्यालये/मंडळे/सार्वजनिक उपक्रम

उ) सर्व खाजगी, व्यापारी बँका

या कार्यक्रमाकरिता येणारा खर्च प्रत्येक वित्तीय वर्षात त्या त्या संबंधित विभागाने/कार्यालयाने त्यांच्या कार्यालयीन खर्चासाठी मंजूर होणा-या आर्थिक तरतूदीतून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 201508111516284533 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Leena Vivek Dhuru

Digitally signed by Leena Vivek Dhuru
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Leena Vivek Dhuru
Date: 2015.08.11 16:37:18 +05'30'

**लिना वि. धुरू**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा.राज्यपाल यांचे सचिव,

२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

३. सर्व मा.मंत्री /राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,

४. मा.मुख्य सचिव/सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/ सचिव सर्व मंत्रालयीन विभाग,
५. सर्व विभागीय आयुक्त,
६. सर्व जिल्हाधिकारी,
७. कुलगुरू, सर्व विद्यापीठे
८. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
९. शिक्षण संचालक (प्राथमिक/माध्यमिक/उच्चमाध्यमिक/प्रौढ शिक्षण व अल्पसंख्यांक), महाराष्ट्र राज्य, पुणे
१०.शिक्षण संचालक (उच्च शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
११. मा.मंत्री, मराठी भाषा यांचे विशेष कार्यकारी अधिकारी
१२. प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई (पत्राने)
१३. प्रबंधक, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई (पत्राने)
१४. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ, विधान भवन, मुंबई,
१५. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
१६.महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
१७.महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), मुंबई
१८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
२०. भाषा संचालक, भाषा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२१. सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृती मंडळ, मुंबई
२२. सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई
२३. प्रशासकीय अधिकारी, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई
२४. सर्व विभागीय सहायक भाषा संचालक, पुणे/नागपूर/औरंगाबाद/नवी मुंबई
२५. निवडनस्ती (भाषा-२)